20110303192647001

# महाराष्ट्र शासन

क्रमांक: पीएमसी २००९/८६८/प्र.क्र.२७८/नवि-२२
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २४ फेब्रुवारी,२०११

प्रति,

आयुक्त,
पुणे महानगरपालिका,
पुणे.

विषय : पुण्यातील हाजी मक्केशाह मस्जिदच्या पुनर्बांधणी संदर्भात कायदा व सुव्यवस्था आणि रहदारी यांच्या अनुषंगाने ना-हरकत प्रमाणपत्र देण्याबाबत.

संदर्भ :- १) नगर अभियंता, पुणे शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.नआ/ घो.रो./ बां.नि./२५८,दि.३०/०५/२००९.
२) गृह विभागाचे पत्र क्र. एमआयएस ०२१०/प्र.क्र.५६/ वशा-१ ब , दि.२४/२/२०१०
३) उपसचिव, गृह विभाग यांचे पत्र क्र. सीटीएम-०१०७ / प्र.क्र.२४/ विशा-१ ब, दि.४/८/२०१०

महोदय,

उपरोक्त विषयाच्या अनुषंगाने कळविण्यात येते की, गृह विभागाने संदर्भाधिन क्र.३ येथे पत्रात नमूद ६ अटींच्या अधिन राहून तसेच कायदा, सुव्यवस्था व रहदारी याबाबी विचारात घेवून, पुण्यातील हाजी मक्केशाह मस्जिदच्या पुनर्बांधणीस मान्यता दिलेली आहे. सदर पत्राची पत्र पुढील योग्य त्या कार्यवाहीसाठी सोबत जोडली आहे.

०२. उक्त नमूद गृह विभागाचे ना हरकत प्रमाणपत्रानुसार पुणे महानगरपालिकेच्या मान्यतेने विकास नियंत्रण नियमावलीस अधिन राहून सदर हाजी मक्केशाह मस्जिदच्या पुनर्बांधणीस या विभागाची हरकत वाटत नाही, असे आपणांस कळविण्याचे मला निदेश आहेत.

आपला,

[ सुनील कोठेकर ]
कक्ष अधिकारी महाराष्ट्र शासन

प्रत,

१) पोलीस आयुक्त, पुणे शहर,पुणे
२) उपसचिव (विशा-१ ब),गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
३) शहर अभियंता, पुणे शहर महानगरपालिका,पुणे
४) अतिरिक्त शहर अभियंता, पुणे शहर महानगरपालिका,पुणे
५) कक्ष अधिकारी (विशा-१ ब),गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
६) कक्ष अधिकारी (संगणक शाखा),नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
७) निवडनस्ती (नवि-२२)

महाराष्ट्र शासन

क्र:- सीटीएम ०१०७/प्र.क्र.२४/ विशा-१ब
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ४ ऑगस्ट, २०१०

नगर विकास विभाग
22
07 AUG 2010
अनु. क्रमांक

९५४५/नावि.२२
८/९०/१०

प्रति,
प्रधान सचिव,
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई.

विषय - पुण्यातील हाजी मक्केशाह मस्जिदच्या पुनर्बांधणी संदर्भात कायदा व सुव्यवस्था आणि रहदारी यांच्या अनुषंगाने ना-हरकत प्रमाणपत्र देण्याबाबत.

संदर्भ - शासनाचे समक्रमांकाचे दिनांक २६.६.२००७ व १७.८.२००७ चे पत्र

वरील विषयाबाबतचे या विभागाचे समक्रमांकाचे दिनांक २६.६.२००७ व १७.८.२००७ चे पत्राला सातत्य राखून याबाबत असे कळविण्यात येते की, सदर प्रकरणी कायदा व सुव्यवस्था तसेच रहदारी याबाबी विचारात घेऊन खालील अटींच्या अधीन राहून गृह विभागाची पुण्यातील हाजी मक्केशाह मस्जिदच्या पुनर्बांधणीस मान्यता देण्यात येत आहे.

१) मस्जिदीचे नुतनीकरण व वाढीव बांधकाम पुणे महानगरपालिकेने मंजूर केलेल्या आराखड्यानुसार करण्यात यावे.

२) मस्जिदीत येणारे भाविक, अभ्यागत यांची वाहने उभी करण्यासाठी पार्किंगची पुरेशी व्यवस्था करण्यात यावी.

३) मस्जिदीमध्ये येणाऱ्या भाविकांकडून तसेच अन्य व्यक्तींकडून परिसराचा शांतताभंग होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४) मस्जिदीमध्ये पुरेशी सुरक्षा व्यवस्था आणि कायमस्वरुपी प्रकाश व्यवस्था मस्जिद परिसरात संबंधितांकडून करण्यात यावी.

५) या ठिकाणी भरविण्यात येणारे उरुस/उत्सव, प्रार्थना (नमाज) इ. प्रसंगी येणा-या भाविकांच्या/व्यक्तींच्या सुरक्षिततेसाठी सोयी-सुविधांबाबत आवश्यक ती खबरदारी संबंधित विश्वस्तांकडून घेण्यात यावी.

६) ध्वनीप्रदुषणासंबंधी मा. उच्च न्यायालय व इतर न्यायालये व शासन यांचे प्रचलित तसेच भविष्यात दिले जातील असे सर्व आदेश तंतोतंत पाळण्यात यावेत.

(सु.ग.सोनावणे)
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत माहितीसाठी
१) पोलिस आयुक्त,पुणे.
२) निवड नस्ती
३) संग्रहार्थ नस्ती.

D:\sanjay\2010CR 230 -10 - 31.7.10 lwp